**उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ, पुणे यांच्या अधिनस्त वाहन क्रमांक एमएच १२ एएच ८६०४ ( टाटा इंडिगो ) च्या दुरूस्तीवरील झालेल्या खर्चास मान्यता.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः वाहन-२०१५/ प्र.क्र.१५०/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ३० ऑक्टोबर, २०१५.

**वाचा**

१) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ आस्था/ कक्ष-५/ टे-२/ वाहन दुरूस्ती/ २०७६-७७/१५, दि.३.०८.२०१५.**

**प्रस्तावना**

संदर्भाधीन पत्रान्वये संचालक, आरोग्य सेवा यांनी उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ, पुणे यांच्या कार्यालयातील वाहन क्रमांक एमएच-१२ एएच ८६०४ (टाटा इंडिगो) या वाहनाच्या दुरूस्तीकरीता झालेल्या खर्चास मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. या वाहनाच्या दुरूस्तीकरीता आवश्यक सुटे भाग उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे या कार्यालयात उपलबध नसल्याने सदर वाहनाची दूरूस्ती वाहनाचे अधिकृत विक्रेते मे. पंडीत ऑटोमोटीव्ह, प्रा.लि., पुणे यांच्याकडे करून घेण्यात आली आहे. सदर वाहन दुरूस्तीकरीता एकूण रूपये १,२२,८३०/- (अक्षरी रूपये एक लक्ष बावीस हजार आठशे तीस मात्र) इतका खर्च झालेला असून या खर्चाची देयके शासनास प्राप्त झालेली आहेत. सदर वाहनाच्या दुरूस्तीवरील झालेला खर्च वाजवी असल्याबाबत सेवा व्यवस्थापक, विभागीय कार्यशाळा, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांच्या दि.२१.०९.२०१५ च्या पत्रान्वये प्रमाणित करण्यात आले आहे. या अनुषंगाने सदर वाहनावरील दुरूस्ती खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ, पुणे यांच्या कार्यालयातील वाहन क्रमांक एमएच-१२ एएच ८६०४ (टाटा इंडिगो) या वाहनाच्या पुढील नमूद केल्याप्रमाणे एकूण रूपये १,२२,८३०/- (अक्षरी रूपये एक लक्ष बावीस हजार आठशे तीस मात्र) इतक्या खर्चास प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वाहनाचे नांव व क्रमांक | वाहन वापरणारे अधिकारी/ पदाधिकारी | दुरूस्ती देयकाचा दिनांक | दुरूस्तीवरील खर्च रू. |
|---|---|---|---|---|
| १. | टाटा इंडिगो एमएच-१२ एएच ८६०४ | उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे. | २३.०१.२०१५ | ४५८७१.०० |
| | | | ३.०६.२०१५ | ४७९६८.०० |
| | | | ४.०६.२०१५ | २८९९१.०० |
| | | | **एकूण खर्च** | **१,२२,८३०.००** |

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-२ मधील अनुक्रमांक १९ येथील नियम क्रमांक ५९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०३०१४५३०६०२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.10.30 16:38:41 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहाय्यक संचालक (लेखा व लेखापरिक्षा),आरोग्य सेवा, पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), पुणे.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे परिमंडळ, पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र (लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
८. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (आरोग्य-४).